**गुरु-त्ता-गद्दी त्रिशताब्दी सोहळा,नांदेड**
**नांदेड येथील मालटेकडी रेल्वे उड्डाणपूल (ROB ) कामासाठी निधी वितरीत करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नियोजन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः गुग्रंसा-२०१२/प्र.क्र.१४/का.१४४४**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
तारीखः १२ मे, २०१५.

**वाचा :-**

१) शासन निर्णय क्रमांकः गुग्रंसा-२००८/प्र.क्र.२४/का.१४७३, दि.२६ मार्च, २००९.
२) शासन निर्णय क्रमांकः गुग्रंसा-२०१०/प्र.क्र.६९/का.१४४४, दि.९ नाव्हेंबर, २०११.
३) शासन निर्णय क्रमांकः गुग्रंसा-२००८/प्र.क्र.६९/का.१४४४, दि.२४ जानेवारी, २०१२.
४) शासन ज्ञापन क्र.गुग्रंसा-२०१२/प्र.क्र.१४/१४४४, दि. ३०.०१.२०१५.
५) शासन निर्णय क्र.गुग्रंसा-२०१२/प्र.क्र.१४/१४४४, दि. ३.०२.२०१५.
६) मुख्य प्रशासनिक अधिकारी, दक्षिण मध्य रेल्वे, सिकंदराबाद यांचे पत्र दि. ३०.०१.२०१५
७) शासन निर्णय क्र.गुग्रंसा-२०१२/प्र.क्र.१४/१४४४, दि. ३१.३.२०१५.

**प्रस्तावना :-**

गुरु-त्ता-गद्दी त्रिशताब्दी सोहळा-२००८ या विकास आराखड्यामध्ये मालटेकडी रेल्वे उड्डाणपूलाच्या (ROB ) कामासाठी वाढीव किंमतीपोटी ₹२५८.५८ लक्ष इतका अतिरिक्त निधी वितरीत करण्याची मुख्य प्रशासनिक अधिकारी, दक्षिण मध्य रेल्वे, सिकंदराबाद यांनी उपरोक्त अनु.क्र.६ अन्वये विनंती केली आहे. त्यानुसार सदर कामासाठी अनु.क्र.७ येथील शासन निर्णयान्वये ₹१११.७५ लक्ष निधी वितरीत करण्यात आला आहे. आता उर्वरित ₹१४६.८३ लक्ष निधी जिल्हाधिकारी, नांदेड यांना उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

गुरु-त्ता-गद्दी त्रिशताब्दी सोहळा-२००८ या विकास आराखड्यामध्ये मालटेकडी रेल्वे उड्डाणपूलाच्या (ROB ) कामासाठी जिल्हाधिकारी, नांदेड यांना ₹१४६.८३ लक्ष निधी वितरित करण्यात येत आहे.

२. सदरहू खर्च लेखाशिर्ष “मागणी क्र.ओ-१, मुख्य लेखाशिर्ष २०५३-जिल्हा प्रशासन,०९३-जिल्हा आस्थापना, (०३ ) जिल्हाधिकारी, नांदेड, (०३) (०३) गुरु-त्ता-गद्दी त्रिशताब्दी सोहळा, कार्यक्रमावरील खर्च (२०५३ १२११) योजनातंर्गत (दत्तमत), ३१- सहाय्यक अनुदान (वेतनेत्तर )” याखाली खर्ची टाकण्यात यावा.

३. मालटेकडी रेल्वे उड्डाणपूलाची (ROB ) वाढीव किंमत ₹२५८.५८ लक्षच्या सुधारीत प्रशासकीय मान्यतेचे आदेश निर्गमित केल्यानंतरच उपरोक्त निधी रेल्वे खात्यास अदा करण्यात यावा. तसेच वर नमूद केलेल्या लेखाशिर्षांतर्गत झालेला प्रत्यक्ष खर्च व महालेखापाल कार्यालयाने नोंदविलेल्या खर्चाचा ताळमेळ घालण्यात यावा. वितरित केलेल्या निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास तात्काळ सादर करावे.

४. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या परिपत्रक क्र.अंदाज-२०१५/प्र.क्र.८५/अर्थ-३, दिनांक १७ एप्रिल,२०१५ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०५१३१४२५४४१४१६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ramesh N Jagtap

Digitally signed by Ramesh N Jagtap
DN: CN = Ramesh N Jagtap, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Section Officer
Date: 2015.05.13 14:27:05 +05'30'

**(र.ना.जगताप)**
कार्यासन अधिकारी.

**प्रत,**

१) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा ), महाराष्ट्र -१, मुंबई.
२) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर.
३) जिल्हाधिकारी, नांदेड.
४) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, नांदेड.
५) जिल्हा कोषागार अधिकारी, नांदेड.
६) जिल्हाधिकारी कार्यालय (गुरु-त्ता-गद्दी कक्ष), नांदेड.
७) वित्त विभाग (व्यय-८)/(अर्थ-१६) मंत्रालय, मुंबई.
८) नियोजन विभाग, का.१४२४, मंत्रालय, मुंबई.
९) निवड नस्ती, का.१४४४, नियोजन विभाग, मुंबई.

----------